झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)

शासन निर्णय क्र.: सीडीएम २००५/४१८/सीआर-१६/विशा.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :१८ फेब्रुवारी, २००५.

वाचा :- १) संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. नासंसं/६/५/७६/ झेरॉक्स मशीन/२००५, दि. १४ फेब्रुवारी, २००५.

शासन निर्णय :- नागरी संरक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखाली नागरी संरक्षण शहरे / जिल्हे कार्यरत आहेत व वेळोवेळी या संचालनलयातुन प्रशासनिक दृष्ट्या, प्रशिक्षणाबाबत, लेखाबाबत तसेच चालन ((Operational matters) बाबत विविध गोपनीय आदेशांच्या / परिपत्रकांच्या प्रती दुय्यम कार्यालयांना पाठवाव्या लागतात. तसेच वेगवेगळ्या नागरी संरक्षण युनिटसना प्रशिक्षण व चालन बाबत वेळोवेळी सूचना दिल्या जातात. संपूर्ण राज्याती नागरी संरक्षण संघटना, होमगार्ड संघटनेवर देखरेख ठेवणे, वेळावेळी मार्गदर्शन करणे, टेलीफोन निगमची प्रायव्हेट वायर्सची व भोग्यांची बिले यांच्या झेरॉक्स प्रती काढणे आवश्यक आहे. या सर्व बाबींचा विचार करता नागरी संरक्षण संचालनालयाकरिता एक झेरॉक्स मशीन आवश्यक आहे.

२. तरी नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयासाठी शासनमान्य दर करारावर असलेल्या महासंचालक, पुरवठा व विनियोग, नवी दिल्ली यांच्याकडे उपलब्ध असलेल्या तोशिबा-ई स्टुडीओ-१६० या मॉडेलची झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास व या खरेदीसाठी होणारा रुपये १,०५,०००/- + ४% विक्रीकर रुपये ४,२००/- मिळून रुपये १,०९,२००/- (रुपये एक लाख, नऊ हजार, दोनशे फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-१०६ नागरी संरक्षण (तीन) राज्य नागरी संरक्षण संघटना-०५ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली दर्शवावा व तो सन २००४-०५ च्या चालू आर्थिक वर्षामध्ये मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग दोन मधील अनुक्रमांक २६ (अ) नियम क्रमांक ७६ अन्वये प्रशासकिय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( आ. बा. ढमाळे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
उपसंचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८) (विनियम), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग, बीयुकी-१, मंत्रालय, मुंबई-३२.
निवडनस्ती.